**लोकजागृती शिक्षण संस्था, गोसे (बु.) संचलित बाबा खंताळू माध्यमिक आश्रमशाळा, गोसे (बु.), ता. पवनी, जि. भंडारा ही बंद पडलेली आश्रमशाळा सायली बहुउद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेकडे हस्तांतरीत करुन माध्यमिक आश्रमशाळा, पेंडी (काजळी), ता. हिंगणा, जि. नागपूर या ठिकाणी स्थलांतरीत करुन चालविण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : याचिका-२०२२/प्र.क्र.१५०/विजाभज-५,**
मंत्रालय विस्तारीत इमारत, पहिला मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १२ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) शासन निर्णय,विमुक्त जाती,भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, क्र. विभशा-२०१२/प्र.क्र.२२१/ विजाभज-२, दिनांक २४/०४/२०१८.
२) शासन निर्णय विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, क्र. विभशा-२०१८/प्र.क्र.२०६/विजाभज-२, दिनांक ०७/०३/२०१९.
३) मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांचा याचिका क्र. ६७८१/२०१९ मधिल न्यायालयीन प्रकरणी दिनांक १०/११/२०२२ चा निर्णय.
४) शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: याचिका-२०२२/ प्र.क्र.१५०/विजाभज-१, दिनांक २५/०४/२०२३
५) मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचे Special Leave Pitition (Civil) Diary No. 4654/2023 मधील दिनांक २०/०५/२०२३ रोजीचे आदेश.
६) मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचे Petition for Special Leave to Appeal No. 11476/2023 या न्यायालयीन प्रकरणी दिनांक ५/०१/२०२४ रोजीचे आदेश.
७) शासकीय वकील मा. सर्वोच्च न्यायालय यांचा दिनांक ०३/०२/२०२४ चा ई मेल संदेश.

**प्रस्तावना :-**

लोकजागृती शिक्षण संस्था, गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा संचलित बाबा खंताळू माध्यमिक आश्रमशाळा गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा ही बंद पडलेली आश्रमशाळा सायली बहुद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेकडे हस्तांतरीत करून माध्यमिक आश्रमशाळा, पेंढरी (काजळी), ता. हिंगणा, जि. नागपूर या ठिकाणी स्थलांतरीत करून चालविण्यास संदर्भ क्रमांक ०२ येथील दिनांक ०७/०३/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये तसेच शासनाने वेळोवेळी काढलेले आदेश/परिपत्रक/शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या अटी शर्तींच्या अधिन राहून शैक्षणिक वर्ष सन २०१९-२० पासून आश्रमशाळा सुरु करण्यास संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात आली होती.

२. लोकजागृती शिक्षण संस्था, गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा संचलित बाबा खंताळू माध्यमिक आश्रमशाळा गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा ही बंद पडलेली आश्रमशाळा सायली बहुद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेकडे हस्तांतरीत करण्याबाबतच्या शासन निर्णया विरूध्द अध्यक्ष, नवशाक्ती एज्युकेशन सोसायटी अगरगाव, ता. हिंगणा, जि. नागपूर यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्रमांक ६७८१/२०१९ दाखल केली असून त्यानुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दिनांक १०/११/२०२२ रोजी खालीलप्रमाणे आदेश दिलेले आहेत:-

i. The Government Resolution dated 07.03.2019 issued by the respondent no.1 allotting the Ashram School to the respondent no.3-Society is quashed and set aside.
ii. The State Government is directed to reconsider the matter of allotment of said Ashram School in accordance with the prevailing policy and preferably by issuing a fresh advertisement in that regard
iii. Since the Academic Session 2022-23 is in progress the effect of setting aside the order of allotment in favour of the respondent no.3-Society would be from the end of Academic Session 2022-23.

३. मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.६७८१/२०१९ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक १०/११/२०२२ दिलेल्या आदेशास अनुसरून संदर्भ क्र. ०२ द्वारे लोकजागृती शिक्षण संस्था, गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा संचलित बाबा खंताळू माध्यमिक आश्रमशाळा गोसे(बु), ता. पवनी, जि. भंडारा हो बंद पडलेली आश्रमशाळा सायली बहुद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेकडे हस्तांतरीत करून माध्यमिक आश्रमशाळा, पेंढरी (काजळी), ता. हिंगणा, जि. नागपूर या ठिकाणी स्थलांतरीत करण्याबाबतचा दिनांक ०७/०३/२०१९ रोजीचा संदर्भ क्र. ०२ येथील शासन निर्णय दिनांक २५/०४/२०२३ रोजीचा संदर्भ क्र. ०४ येथील शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आला.

४. सायली बहुद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर यांनी मा. उच्च न्यायालयाच्या उक्त निर्णयाविरुध्द मा. सर्वोच्च न्यायालयात Special Leave Pitition (Civil) Diary No. 4654/2023 दाखल आहे. सदर याचिकेत मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २०/५/२०२३ रोजी खालीलप्रमाणे आदेश दिले आहेत.

1) Delay condoned.
2) Issue notice.
3) Stay granted by the High Court shall continue to operate until further orders.

५. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशामध्ये मा. उच्च न्यायालयाच्या दिनाकं १०/११/२०२२ च्या निर्णयास “स्थगिती” दिली किंवा कसे याबाबत स्पष्ट अर्थबोध होत नसल्याने विधी व न्याय विभाग, नागपूर यांना स्पष्ट अभिप्राय देण्याबाबत विनंती करण्यात आली होती. तथापि, त्यांचेकडून याबाबत स्पष्ट अभिप्राय प्राप्त न झाल्याने शासकीय अभियोक्ता, मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांना कळविण्यात आले होते.

६. याच दरम्यान सायली बहुउद्देशीय सोसायटी, नागपूर यांनी मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे या प्रकरणी पुनश्च Petition for Special Leave to Appeal No. 11476/2023 दाखल केली

असून सदर SLP मध्ये मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी दिनांक ५/१/२०२४ रोजी खालीलप्रमाणे आदेश दिलेले आहेत.

1) As prayed, two weeks time is granted to file reply affidavit in I.A. No. 234864 of 2023.
2) List this application (I.A. No. 234864 of 2023) along with special leave petition after two weeks.

७. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशास अनुसरुन, लोकजागृती शिक्षण संस्था, गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा संचलित बाबा खंताळू माध्यमिक आश्रमशाळा गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा ही बंद पडलेली आश्रमशाळा सायली बहुद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेकडे हस्तांतरीत करून माध्यमिक आश्रमशाळा, पेंढरी (काजळी), ता.हिंगणा, जि. नागपूर या ठिकाणी स्थलांतरीत करण्याबाबतचा दिनांक ०७/०३/२०१९ चे आदेश रद्द करण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २५/०४/२०२३ मा. सर्वोच्च न्यायालयाच्या उक्त निर्णयास अनुसरुन अधिक्रमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने Special Leave Pitition (Civil) Diary No.4654/2023 मध्ये 20/5/2023 रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन, लोकजागृती शिक्षण संस्था, गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा संचलित बाबा खंताळू माध्यमिक आश्रमशाळा गोसे (बु), ता. पवनी, जि. भंडारा ही बंद पडलेली आश्रमशाळा सायली बहुद्देशीय शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेकडे हस्तांतरीत करून माध्यमिक आश्रमशाळा, पेंढरी (काजळी), ता.हिंगणा, जि. नागपूर या ठिकाणी स्थलांतरीत करण्याबाबतचे दिनांक ०७/०३/२०१९ चे आदेश रद्द करण्याबाबतचा संदर्भ क्र. ०४ येथिल शासन निर्णय दि.२५/४/२०२३ मा सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक २०/०५/२०२३ व दिनांक ०५/०१/२०२४ च्या निर्णयास अनुसरुन अधिक्रमित करण्यात येत असुन संदर्भाधिन क्र. ०२ येथे नमूद शासन निर्णय, दिनांक ०७/०३/२०१९ चे आदेश उक्त प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल संदर्भ क्र. ०५ व ०६ अन्वये दाखल Special Leave Pitition (Civil) Diary No.4654/2023 मधिल अंतिम निर्णयाच्या अधिन कायम करण्यात येत आहे.

२. सदर शासन, निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३१३१७४९२५२६३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकन करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.03.13 17:59:20 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव.
४. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव.
५. मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक.
६. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, नागपूर.
८. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नागपूर.
९. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, भंडारा.
१०.अध्यक्ष/सचिव, लोकजागृती शिक्षण संस्था गोसे (बु.), ता. पवनी, जि. भंडारा.
११.अध्यक्ष/सचिव, सायली बहुद्देशीय शिक्षण संस्था, ४४९/ ए, कृष्णवंदन, सरस्वती हायस्कूल समोर, रामावडी, नवी शुक्रवारी, नागपूर.
१२.अध्यक्ष/सचिव, नवशक्ती एज्युकेशन सोसायटी, आगरगाव, पो. उमरी वाघ, ता. हिंगणा, जि. नागपूर.
१३.अध्यक्ष/ सचिव, परिवर्तन शिक्षण संस्था, बेसाळा, पो. गोसे (बु.), ता. पवनी, जि. भंडारा.
१४.निवडनस्ती (विजाभज-५)